**सन २०१८-१९ मध्ये Blood Cell अंतर्गत हिमोफिलीया व थॅलेसेमिया या आजारावरील औषधे आणीबाणी तत्वावर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१०१८/प्र.क्र.५४५/आ -७**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०००01.
दिनांक : १८ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-**

अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोगय अभियान, मुबंई यांचे पत्र क्र. राआअ /राज्यरक्त कक्ष/प्रशासकीय मान्यता/आणिबाणी/७१७१३/१८, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील सात जिल्हा रुग्णालये, केईएम रुग्णालय, मुंबई व बीजे रुग्णालय, पुणे येथे हिमोफिलिया व थॅलेसेमिया रुग्णांसाठी उपचार केंद्र सुरु आहेत. या नऊ ठिकाणी हिमोफिलिया रुग्णांच्या उपचारासाठी वापरण्यात येणाऱ्या Anti-Hemophilia Factor (AHF) या औषधांचा सद्य:स्थितीत तुटवडा निर्माण झाल्याचे दिसून येते. तसेच सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी देखील हिमोफिलिया रुग्णांना तातडीच्या आवश्यक व नियमित उपचारासाठी लागणारी औषेधे पुरविण्याबाबतचे निर्देश मा. उच्च न्यायालयाने दिलेले आहेत. मा. उच्च न्यायालयाने दिलेलेनिर्देश विचारात घेवून हिमोफिलिया व थॅलेसेमिया रुग्णांना वेळेत उचार करणे शक्य व्हावे यासाठी सदर रुग्णांना आवश्यक असणारी औषधे आणीबाणी तत्वावर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शानाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ मध्ये Blood Cell अंतर्गत हिमोफिलिया व थॅलेसेमिया या कार्यक्रमांतर्गत खालील विवरण पत्रामध्ये नमूद केलेली हिमोफिलिया व थॅलेसेमिया आजारावरील औषधे ESIC

च्या दरकरारानूसार व थॅलेसेमिया आजारावरील औषधे हाफकिन बायो-फार्मासीटीकल कॉर्पोरेशन लि., मुंबई यांच्या सन २०१७-१८ मधील निविदेनुसार प्राप्त झालेल्या न्युनतम दराने खरेदी करण्यासाठी रु.१०,२१,२१,८८२/- (रुपये दहा कोटी एकवीस लक्ष एकवीस हजार आठशे ब्याऐंशी फक्त) इतका निधी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| SR. No. | Medicine Name | Unit Rate Including all Taxes (Rs.) | Total Qty. | Total In Rs. Including all Taxes (Rs.) | Remark |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Factor VII / 1mg | 41275.5 / mg | 703 mg | 2,90,16,677/- | **ESIC Rate Contract** |
| 2 | Factor VIII Vial of 250 IU | 2025.45 / Vial | 8250 Vials | 1,67,09,963/- | |
| 3 | Factor IX Vial of 600 IU | 9012 / Vial | 2172 Vials | 1,95,74,064/- | |
| 4 | FEIBA Vial of 500 IU | 23415 / Vial | 1250 Vials | 2,92,68,750/- | |
| 5 | Tab. Deferasirox – 250 mg | 8.3 / Tablet | 353369 | 29,32,963/- | **Haffkine Tender Rate** |
| 6 | Tab. Deferasirox- 500 mg | 14.6/ Tablet | 303650 | 44,33,290/- | |
| 7 | Tab. Deferiprone – 250 mg | 4.4 / Tablet | 8625 | 37,950/- | **DHS Old Tender Rate** |
| 8 | Tab. Deferiprone – 500 mg | 7.7 /Tablet | 19250 | 1,48,225/- | |
| | **Total in Rs.:- Ten Crores Twenty One Lakhs Twenty One Thousand Eight Hundred Eighty Two Only.** | | | **10,21,21,882/-** | |

सदरची प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) थॅलेसेमिया व हिमोफिलियाचे रुग्ण निश्चित असून एकुण रुग्णसंख्या व लागणारी औषधे (डोसेससह) यांची संख्या आणि पुरवठादाराला औषधे देण्यासाठी लागणारा कालावधी (नवीन टेंडरनूसार) याची काटेकोरपणे सांगड घालून औषधे खरेदी करावीत.

२) सदर औषधांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी.

३) सदरहू औषधांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

८) वरील विवरणपत्रामध्ये नमूद औषधांची प्रस्तावित खरेदी ही सन २०१८-१९ मधील PIP मध्ये मंजूर झालेल्या रु.२८८८.०० लक्ष अनुदानातून FMR Code 6.2.7.2 च्या सदरात येणाऱ्या Drugs and supplies for blood related disorders Haemoglobinopathies या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

९) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१२) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

वरील १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व औषधांची खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे करण्यात आली आहे किंवा नाही हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांची राहील. तसेच, सदर खरेदी ही सहसंचालक (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांच्या मार्फत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201812181230309317 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2ac85a22a7c244beaad68d7bf50398b67204dc905155ddd4219e64a8ba0c058, cn=S. A. Pedgaonkar
Date: 2018.12.18 12:50:32 +05'30'

**( सु. अ. पेडगावकर )**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) महालेखापाल (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) संबंधित कोषागार अधिकारी
६) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
७) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
८) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
९) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
१०) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
११) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१२) निवडनस्ती (आरोग्य-७)